बांधकाम कामगारांची ग्रामपंचायत स्तरावर
नोंदणीकरण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः व्हीपीएम-२०१५/प्र.क्र.२३७/पंरा-३

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: १६ नोव्हेंबर, २०१५

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यात सुमारे ३ लाख बांधकाम कामगार नोंदणीकृत असून सदर कामगारांची नोंद बांधकाम कामगार कल्याण मंडळ करते. परंतु ज्या बांधकाम व इतर बांधकाम कामगाराचे काम सातत्य नसलेले / अस्थायी/ दैनंदिन स्वरुपाचे काम आहे आणि त्यामुळे कामगारांना एका पेक्षा जास्त मालकांकडे काम करावे लागते अशा व जे स्थानिक नाका कामगार असतात ते कोणत्याही प्रकारच्या आस्थापनेवर कार्यरत नसतात त्यामुळे महाराष्ट्रात ही संख्या कमी दिसू लागली आहे. कामगारांची नोंदणी झाल्यानंतर त्यांना जीवन विमा, वैद्यकीय सुविधा, त्यांच्या मुलांना उच्च शिक्षणासाठी सवलत यासारख्या सुविधा शासनाकडून देण्यात येतात. त्यामुळे त्यांची या विभागामार्फत ग्रामपंचायत स्तरावर नोंद करण्याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने सूचना दिल्या आहेत

## शासन परिपत्रक -

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार विनियमन व सेवाशर्ती) अधिनियम कलम ३३ प्रमाणे ग्रामपंचायतीने ग्रामसेवकांमार्फत बांधकाम कामगारांना नोंदणी प्रमाणपत्र देण्याबाबतच्या सूचना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या अखत्यारितील सर्व ग्रामपंचायतींना त्यांचेमार्फत सूचना द्याव्यात. प्रमाणपत्राचा नमुना यासोबत जोडला आहे.

सदर प्रमाणपत्र देताना कामगारांच्या वास्तव्याचा अधिकृत पुरावा व अधिकृत फोटो असलेल्या ओळखपत्राचा पुरावा (मतदान ओळखपत्र किंवा पॅन कार्ड किंवा बँकेचे पासबुक किंवा आधारकार्ड) जमा करण्यात यावे. नोंदणी करण्याकरीता कामगाराने वर्षभरात किमान ९० दिवस काम करणे आवश्यक आहे. याबाबत खातरजमा करण्यात यावी.

वरील सूचनेनुसार दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ पर्यंत प्रत्येक ग्रामपंचायत क्षेत्रात ग्रामसेवकामार्फत स्थानिक नाका कामगारांना प्रमाणपत्र देण्याची धडक मोहीम हाती घेण्यात यावी व केलेल्या कार्यवाहीबाबत या विभागास दिनांक ०५ जानेवारी, २०१६ पर्यंत अवगत करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१११६१६३४४०२३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Girish Dinkar Bhalerao

Digitally signed by Girish Dinkar Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=415001, st=Maharashtra, cn=Girish Dinkar Bhalerao
Date: 2015.11.16 17:23:14 +05'30'

**गिरिश दि भालेराव**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई .
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई § ३२
४. मा. मंत्री ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व विभागीय आयुक्त
८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
९. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
१०. सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती
११. सर्व मंत्रालयीन विभाग
१२. ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व पर्यवेक्षिय अधिकारी व कार्यासन अधिकारी
१३. निवडनस्ती (का.क्र.पंरा-३)

प्राधिकरणाचे नाव व पत्ता ............................................
.............................................
.............................................

# प्रमाणपत्र

(बांधकाम कामगारांने काम केल्याचा दाखला)

प्रमाणित करण्यात येते की, श्री/ श्रीमती....................................................... हे / ह्या .......................................................... मालकाकडे / आस्थापनेत / कंत्राटदाराकडे (कामाचे ठिकाण) ..............................................................................येथे दिनांक ...................... पासून ...........................................(कामाचे स्वरुप) म्हणून काम करीत आहेत.

श्री/ श्रीमती .................................................................. हे बांधकाम कामगार म्हणून काम करत असल्याची खात्री केलेली असून त्याबाबत आज दिनांक ...................... रोजी प्रमाणपत्र देत आहे.

(प्राधिकृत अधिकाऱ्याचे नाव, पदनाम व स्वाक्षरी)

१) बांधकाम कामगाराचे नाव व पत्ता - .....................................................
.....................................................

२) दूरध्वनी / मोबाईल नंबर - .....................................................